विभागातील गट - ड संवर्गातील मंजूर असलेल्या पदांपैकी २५% पदे निरसित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती-२०१५/प्र.क्र.१४६/का-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०७ डिसेंबर, २०१६

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२००८/प्र.क्र.१९२/का-१ दि.२७ जानेवारी, २००९
२) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१ दि.१४ जानेवारी, २०१६

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन क्र.१ येथील दि. २७.०१.२००९ अन्वये नवनिर्मित अल्पसंख्यांक विकास विभागासाठी एकूण ६९ पदांच्या आकृतीबंधास मान्यता दिली आहे. याअंतर्गत ३१ पदे अन्य विभागांकडून या विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आली असून उर्वरीत ३८ नवीन पदे निर्माण करण्यात आली आहेत. दि. २७.१.२००९ च्या आकृतीबंधानुसार विभागाच्या आस्थापनेवर गट-ड संवर्गाचे शिपायांची १३ पदे मंजूर आहेत. गट-ड संवर्गात मंजूर असलेल्या शिपाई पदांच्या १३ पदांपैकी २५% पदे निरसित करण्याचे निर्देश संदर्भाधिन क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आले आहेत. सदर पदे निरसित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ मधील निर्देशानुसार आता आकृतीबंधानुसार मंजूर असलेल्या गट-ड मधील शिपाई संवर्गातील १३ मंजूर पदांपैकी २५% म्हणजेच ३ रिक्त पदे याद्वारे निरसित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०७१७३२४९२९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suhas Madhav Mamdapurkar

Digitally signed by Suhas Madhav Mamdapurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15e9cd7730234dc2963eb61397dd04240c15d02a5a148c43a83593ac725fd19c, serialNumber=f1b00e7181536eedd7b08803397fed3a96870ca795c4d9384b72f43a5a066d99, cn=Suhas Madhav Mamdapurkar
Date: 2016.12.07 17:34:56 +05'30'

**( सुहास ममदापूरकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), प्रतिष्ठा भवन, महर्षी कर्वे रोड,न्यु मरीन लाईन, मुंबई
२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पुर्व) मुंबई-४०० ०५१
३. अधिदान व लेखाधिकारी, लेखा व अधिदान कार्यालय, फ्री प्रेस रोड, मुंबई-२०
४. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
५. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव (वित्तिय सुधारण-१/विनियम, वित्त) विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
७. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का-१०, मंत्रालय, मुंबई -३२
८. निवड नस्ती (का-१).